**महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली यांच्या कार्यालयात मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांच्या दिल्ली भेटी दरम्यान वापरासाठी दोन बुलेटप्रुफ वाहने खरेदी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सदन २४१५/१८२/प्र.क्र.२६/१५/२०-अ**
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०१५

**वाचा :** १) निवासी आयुक्त व सचिव यांचे पत्र क्र. RC/Off.Corr.२०१४-१५/३००, दिनांक २३.२.२०१५.

२) सहायक निवासी आयुक्त यांचे पत्र क्र.आरसी/एआरसी/सिक्युरिटी/१५/५२१, दिनांक ८.४.२०१५.

३) महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे परिवार प्रबंधक कार्यालय यांचे पत्र क्र.रापप्र/गॅरेज/२०१५/८३३, दिनांक ३१.८.२०१५.

**प्रस्तावना :-**

मा. राज्यपाल व मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांच्या नवी दिल्ली दौऱ्याच्या वेळी सुरक्षेच्या दृष्टीने बुलेट प्रुफ (Bullet Proof) वाहन उपलब्ध असणे आवश्यक आहे. बुलेटप्रुफ वाहने अतिशय कमी संख्येमध्ये असल्यामुळे बऱ्याच वेळी दिल्ली पोलीस यांचेकडून बुलेटप्रुफ वाहने उपलब्ध होऊ शकत नाहीत. यास्तव मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांच्या नवी दिल्ली येथील दौऱ्याकरिता सुरक्षेच्या कारणास्तव दोन बुलेटप्रुफ वाहने खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावास राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने दिनांक ०९.०६.२०१५ रोजी मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णय :-**

सचिव व निवासी आयुक्त महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली यांच्या कार्यालयामध्ये मा.राज्यपाल व मा.मुख्यमंत्री यांच्या दिल्ली भेटी दरम्यान वापरासाठी प्रत्येकी एक याप्रमाणे दोन बुलेटप्रुफ वाहने (वाहनाची किंमत + विक्रीकर + टेम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस + मुल्यावर्धित कर + सहाय्यभूत साहित्य इत्यादी बाबींचा अंतर्भाव असेल) खरेदी करण्यास दोन्ही वाहनांची एकूण किंमत रु.१,४०,००,०००/- (रु.एक कोटी चाळीस लक्ष फक्त) याव्दारे मान्यता देण्यात येत आहे. मा.राज्यपाल यांच्यासाठी “मर्सिडीज बेंझ E३५० (बुलेटप्रुफ)” व मा.मुख्यमंत्री यांच्यासाठी “टोयोटा फॉर्च्युनर, (बुलेटप्रुफ)” या मॉडेलचे वाहन शासन विहित कार्यपद्धतीने खरेदी करावे.

२. याबाबीवर होणारा खर्च सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व “मागणी क्र.ए-४, २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा, ०९२, इतर कार्यालये, (०४) (०१) निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, (२०५२ ०१२३), ५१-मोटार वाहने” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग, अनौ.संदर्भ क्र.२६९/१५/विनियम, दि.९.६.२०१५ व ५०२/१५/व्यय-४, दि.२६.६.२०१५ तसेच क्र. ७२८/१५/व्यय-४, दि. १९.१०.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०७३११३०९२५४३०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shilpa Rajendra Deshmukh

Digitally signed by Shilpa Rajendra Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shilpa Rajendra Deshmukh
Date: 2015.11.19 12:54:50 +05'30'

**( शिल्पा देशमुख )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रती,**

१. सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
२. अप्पर मुख्य सचिव (प्र.सु.व र.व का.) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. परिवहन आयुक्त, सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती, प्रशासकीय इमारत बांद्रा (पूर्व),मुंबई- ४०० ०५१,
५. प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. महालेखापाल (लेखापरिक्षा),१/२, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
९. निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
१०.कक्ष अधिकारी, (व्यय-४/विनियम)वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-२५, मंत्रालय, मुंबई,
१२.निवड नस्ती.